<u>निधी वितरणाबाबत प्रस्ताव राष्ट्रीय स्पर्धांमध्ये प्राविण्य मिळविणा-या राज्य संघटनांना सहाय्यक अनुदान</u>.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : निविप्र-२०१६ /प्र.क्र.२७ /क्रीयुसे -३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख : ०४ फेब्रुवारी, २०१७.

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय क्रमांक पीएचई-१०८९/प्र.क्र.३०२/क्रीयुसे-१ दि. २७ मार्च,१९९७

२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसं-३, दि.२० एप्रिल, २०१६ .

३) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक. निधी वितरण/रास्पप्रामिराज्यसंघटनाआस / फेरप्रस्ताव/२०१६-१७/का-६, दि.१७ सप्टेंबर, २०१६.

<u>प्रस्तावना : -</u>

राज्याच्या क्रीडा धोरण २०१२ नुसार राष्ट्रीय स्पर्धा, महाराष्ट्राचे संघ विशेषत: खो-खो, कबड्डी, बास्केट बॉल, जलतरण, बॅटमिंटन, टेबलटेनिस, फूटबॉल, इ. इनेक खेळात कामगिरी बजावित असतात. परंतु त्यांच्या या कार्याचे योग्य मुल्यमापन होत नाही. राज्य संघटनांची आर्थिक स्थिती कमकुवत असल्यामुळे राज्यामध्ये त्या त्या खेळाचा मोठयाप्रमाणावर प्रचार व प्रसार करणे राज्य संघटनांना शक्य होत नाही. त्यासाठी अनुदानाचा उपयोग संबंधित राज्य संघटनेने राज्यात खेळाचा विकास करणे आवश्यक असल्याने शासन निर्णय क्रमांक पीएचई-१०८९/प्र.क्र.३०२/क्रीयुसे-१ दि. २७ मार्च,१९९७ अन्वये आर्थिक सहाय्य देण्यात येते. सन २०१५-१६ मध्ये या उपक्रमाकरीता रु.१,३५,००० लक्ष इतका अर्थसंकल्प निधी खर्ची टाकण्यात आला आहे. सन २०१६-१७ या कालावधीकरीता प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीकरीता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु.१.५० लक्ष इतक्या तरतुदीपैकी वित्त विभागाच्या दि.२०.४.२०१६ च्या परिपत्रकानुसार रु.१.२० लक्ष इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय :-**</u>

महाराष्ट्राचे संघ विशेषत: खो-खो, कबड्डी, बास्केट बॉल, जलतरण, बॅटमिंटन, टेबल टेनिस, फूटबॉल, इ. इनेक खेळात कामगिरी बजावित असतात. परंतु त्यांच्या या कार्याचे योग्य मुल्यमापन होत नाही. राज्य संघटनांची आर्थिक स्थिती कमकुवत असल्यामुळे राज्यामध्ये त्या त्या खेळाचा मोठयाप्रमाणावर प्रचार व प्रसार करणे राज्य संघटनांना शक्य होत नाही. त्यासाठी अनुदानाचा उपयोग संबंधित राज्य संघटनेने राज्यात खेळाचा विकास करणे आवश्यक असल्याने त्यांना आर्थिक सहाय्य करता यावे यासाठी रु. १.५० लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पीत आहे. त्यापैकी रु.१.२० लक्ष इतकी तरतुद वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त विषयाच्या अनुषंगाने (३६) (०१)राष्ट्रीय स्पर्धांमध्ये प्राविण्य मिळविणा-या राज्य संघटनांना वित्तीय सहाय्य, ३१ सहाय्यक अनुदान (२२०४-२०९१) या लेखाशीर्षाखाली ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१ . वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.५. परिपत्रकातील "अ" व "ब" ची पूर्तता होत आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ व दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०४१७३०४७४६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.02.04 17:33:49 +05'30'

**(कि.ल. संखे)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
८. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९. निवडनस्ती, क्रीयुसे-३